**अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक या कार्यालयांतर्गत असलेल्या नाशिक परिमंडळ कार्यालयाचा कार्यभार अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक या कार्यालयाकडे सोपविण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- आढावा-२०१९/प्र.क्र.१३/२०१९/आस्था.(पुनर्रचना)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
दिनांक : १७ फेब्रुवारी,२०२३

**वाचा:** १) वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दि.१५.१०.१९९२.
२) जलसंपदा विभाग, शासन निर्णय क्र : आढावा-२००९/(१२६/२००९)/निवसं-३/आ(प्रशि), दि.२४.०७.२००९.
३) महासंचालक (सं.प्र.ज.सं व सु.), मेरी यांचे पत्र जा. क्रमांक: मसं/संप्रजसंसु/आस्था/१५२/२०२२, दि.१६.०९.२०२२.

**प्रस्तावना :-**

अधीक्षक अभियंता, घाटघर जलविद्युत प्रकल्प मंडळ, नाशिक यांच्या अधिनस्त असलेले नाशिक परिमंडळ कार्यालय त्या अंतर्गतच्या ५ मंजूर पदांसह संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक या कार्यालयाकडे संलग्न करण्यात येऊन त्यांना परिमंडळीय अधिकारी म्हणून घोषित करण्यात आले होते. तथापि, या मंडळ कार्यालयाकडे (सर्व) धरणांच्या दरवाजांचे तपशीलवार संकल्पन अहवाल व संकल्पचित्रे तयार करणे, वेळोवेळी प्रत्यक्ष कामाच्या ठिकाणी भेट देणे, वार्षिक संकल्पचित्र कार्यक्रम तयार करणे इ. कामकाज करण्यात येते. राज्यभरातून संकल्पनासाठी येणाऱ्या मूलभूत तांत्रिक कामाची व्याप्ती व त्या कामास न्याय देण्याच्या दृष्टीने सदर मंडळ कार्यालयाकडील नाशिक परिमंडळ कार्यालयाचा कार्यभार शासनाकडील अन्य कार्यालयांकडे सोपविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

अधीक्षक अभियंता (दरवाजे), मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक या कार्यालयांतर्गत असलेले नाशिक परिमंडळ हे कार्यालय अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक या कार्यालयास संलग्न करण्यात येत आहे. सदर कार्यालयाच्या कामकाजाकरीता अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांना परिमंडळीय अधिकारी म्हणून घोषित करण्यास खालील अटींच्या अधीन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१) परिमंडळाच्या कामकाजाशी संबंधित असलेली प्रथम लिपिक-१, वरिष्ठ लिपिक-१, कनिष्ठ लिपिक-२ व शिपाई-१ अशी एकूण ५ मंजूर पदे ही अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांच्याकडे वर्ग करण्यात यावीत.

२) परिमंडळाशी संबंधित सर्व अभिलेख अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांनी प्राप्त करून घ्यावा व परिमंडळीय अधिकारी म्हणून कामकाज पहावे. परिमंडळ कार्यालय शासकीय इमारतीच्या जागेत कार्यान्वित करण्यात यावे व त्यासाठी बांधकामाचा वेगळ्याने खर्च करु नये.

३) स्थलांतरणाने कार्यान्वित होणाऱ्या परिमंडळ कार्यालयांसाठी सध्याच्या कार्यरत कार्यालयातील उपलब्ध साहित्याचाच वापर करण्यात यावा. प्रशासकीय व आस्थापना खर्चात वाढ होणार नाही याची दक्षता घ्यावी. जेणेकरुन शासनावर कोणताही आर्थिक भार पडणार नाही.

**२.** परिमंडळीय कार्यालयाच्या मंडळीय नियंत्रणात बदल होत असल्याने, या कार्यालयासाठी वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.टिआरडब्ल्यू-१०८३/सीआर-६११/८३/एडीएम-९,दि.८/३/१९८४ मधील तरतूदीनुसार अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक नियंत्रक अधिकारी तसेच याच मंडळ कार्यालयाच्या सहायक अधीक्षक अभियंता यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**३.** परिमंडळीय कार्यालयातील कार्यरत कर्मचारी यांचे वेतन व वेतनेतर प्रयोजनावरील खर्च हा अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक यांच्या अर्थसंकल्पित तरतूदीतून भागविण्यात यावा.

**४.** परिमंडळीय कार्यालय अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक या कार्यालयाच्या नियंत्रणाखाली दि.०१.०३.२०२३ पासून कार्यान्वित होईल या दृष्टीने आवश्यक ती सर्व कार्यवाही संबंधित कार्यालयांनी करावी.

**५.** हा शासन निर्णय, वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: १०९२/सीआर-८०६/व्यय-६, दिनांक १५/१०/१९९२ मधील तरतूदींनुसार विभागास प्रदान केलेल्या प्राधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

**६.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०२१७१६३२३१६३२७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

RAKHI SACHIN CHAVAN

Digitally signed by RAKHI SACHIN CHAVAN
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=7206b9312f3f73ff523e7a493d6d53d819f5c15336ff9a16ada11a287b879985, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=75AA5A95E2FE606BB64628D64D984EA9D651466BF93A6A2C44EEC93DF9207974, cn=RAKHI SACHIN CHAVAN
Date: 2023.02.17 16:37:39 +05'30'

**(राखी चव्हाण)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अप्पर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) सचिव (ज.सं.व्य. व लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
३) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
४) महासंचालक,संकल्पन,प्रशिक्षण,जलविज्ञान,संशोधन व सुरक्षा (DTHRS) मेरी, नाशिक.

५) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता) मुंबई/ नागपूर
६) महालेखापाल १ व २, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा) मुंबई/ नागपूर
७) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८) सर्व कार्यकारी संचालक, जलसंपदा विभाग.
९) मुख्य अभियंता, मध्यवर्ती संकल्पचित्र संघटना, नाशिक.
१०) सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग.
११) उप सचिव (सेवा)/ उप सचिव (आस्था)/उप सचिव (प्रशा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) अधीक्षक अभियंता (दरवाजे), महाराष्ट्र संकल्पचित्र संघटना, नाशिक.
१३) अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नाशिक.
१४) कार्यकारी अभियंता, प्रशासन संगणकीकरण विभाग, पुणे.
(कार्यालयाच्या नियंत्रणात होणाऱ्या बदलांची नोंद घेण्यास्तव अग्रेषित)
१५) कार्यासन आस्थापना (पुनर्रचना) संग्रहार्थ.